राज्यातील शासनाने अर्थसहाय्यासाठी घेतलेल्या व घेण्यात येणाऱ्या सर्व सहकारी सूत गिरण्यांची सुधारीत प्रकल्प अहवाल किंमत निश्चित करणे व प्रकल्प किंमती संदर्भात निकष / धोरण निर्धारीत करण्यासाठी समिती नियुक्त करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सूतगि ११०८/प्र.क्र.९१/टेक्स१(अ)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० जुलै, २०१४.

**वाचा :-**

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक-सूतगि ११०८/प्र.क्र.९१/टेक्स १ (अ), दिनांक : २५ नोव्हेंबर, २०१०.

२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक-सूतगि ११०८/प्र.क्र.९१/टेक्स १ (अ), दिनांक : ३० जून, २०११.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सहकारी सूत गिरण्यांची प्रकल्प अहवालाची किंमत सुधारीत करण्यास मंजूरी देणेबाबत धोरण / निकष ठरविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २५ नोव्हेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये मा.मुख्यसचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती नियुक्त करण्यात आली होती. सदर समितीचा कार्यकाल संपुष्टात आला आहे.

शासनाने अर्थसहाय्यासाठी घेतलेल्या व घेण्यात येणाऱ्या सर्व सहकारी सूत गिरण्यांची सुधारीत प्रकल्प अहवाल किंमत निश्चित करणे व प्रकल्प किंमती संदर्भात निकष / धोरण निर्धारीत करण्यासाठी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय –**

शासन आता राज्यातील शासनाने अर्थसहाय्यासाठी घेतलेल्या व घेण्यात येणाऱ्या सर्व सहकारी सूत गिरण्यांची सुधारीत प्रकल्प अहवाल किंमत निश्चित करणे व प्रकल्प किंमती संदर्भात निकष / धोरण निर्धारीत करण्यासाठी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अ.मु.स. / प्र.स. / सचिव (नियोजन) | सदस्य |
| ३ | अ.मु.स. / प्र.स. / सचिव (वित्त) | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (उद्योग) | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव (सा.बा.वि.) | सदस्य |
| ७ | कार्यकारी संचालक, म.रा. सह. वस्त्रोद्योग महासंघ | सदस्य |
| ८ | संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर | सदस्य सचिव |

प्रस्तुत समिती सहकारी सूत गिरण्यांच्या प्रकल्प किंमत निश्चितीबाबत भविष्यात उपस्थित होणाऱ्या बाबीसंदर्भात आवश्यकतेनुसार खालील विषयावर निर्णय घेईल.

अ) सहकारी सूत गिरण्यांची सुधारीत प्रकल्प अहवाल किंमत निश्चित करणे.

आ) प्रकल्प किंमती संदर्भात निकष / धोरण निर्धारीत करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१२३५०२११०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anilkumar Ramdaspant Ugle

Digitally signed by Anilkumar Ramdaspant Ugle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anilkumar Ramdaspant Ugle
Date: 2014.08.22 12:31:49 +05'30'

**( अनिलकुमार रा. उगले )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, मा. मुख्यमंत्री सचिवालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
४. मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
५. अ.मु.स. (नियोजन), मंत्रालय, मुंबई,
६. अ.मु.स. (वित्त), मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (उद्योग), मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (सा.बा.वि.), मंत्रालय, मुंबई,
१०. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई,
१२. निवड नस्ती (टेक्स १ (अ)/(ब) ).